**श्री. आदिनाथ लहानू दगडे, उपनिबंधक यांना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक येथे महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन आदेश क्रमांकः आस्था-२०१६/प्र.क्र.१८३/का. १५.

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २७ ऑक्टोंबर, २०१६

<u>वाचा :-</u>

१) सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभागाचे पत्र क्र.राजस-२०१६/प्र.क्र.२४३/५-स, दि.२३/०९/२०१६

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचे पत्र क्र.आविम /प्रशा / आस्था १/१९८२/२०१६, दि.२९/०९/२०१६.

**शासन आदेश :-**

श्री.आदिनाथ लहानू दगडे, उपनिबंधक,सहकारी संस्था,नाशिक गट-अ यांची महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक येथे महाव्यवस्थापक (प्रशासन) या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. यानुसार श्री. आदिनाथ दगडे यांनी सदर पदावर त्वरीत रूजू व्हावे.

२. श्री.आदिनाथ दगडे यांची सदर नियुक्ती ही महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदाचा पदभार स्विकारल्यापासून एक वर्ष किंवा शासनाचे पुढील आदेश यापैकी जे अगोदर होईल त्या कालावधीसाठी राहील.

३. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक मधील महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदाची वेतनसंरचना रू.१५६००-३९१००, ग्रेड वेतन ६६०० अशी आहे. तथापि, श्री. दगडे हे रू.१५६००-३९१००,ग्रेड वेतन ५४०० या वेतनसंरचनेमधील अधिकारी असल्यामुळे ,महाव्यवस्थापक (प्रशासन) या पदाची वेतनसंरचना श्री.दगडे हे सदर पदावर कार्यरत असेपर्यंत रू.१५६००-३९१००,ग्रेड वेतन ५४०० या वेतनसंरचनेत तात्पुरत्या स्वरूपात अवनत करण्यात येत आहे.

४. सदर आदेश सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभागाने संदर्भीत दि.२३/०९/२०१६ च्या पत्रान्वये दिलेल्या सहमतीनूसार तसेच व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक यांनी संदर्भीत दि.२९/०९/२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. श्री.आदिनाथ दगडे यांना सदर पदावर रुजु होण्यासाठी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

६. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१६१९४४९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2016.10.27 16:22:53 +05'30'

**( प्रभाकर बा.गावडे )**
**उप सचिव**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास ) , मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) , मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव , सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य -१, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य -२, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य -१, मुंबई
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य -२, नागपूर
११.सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.उप सचिव ( आस्थापना), सहकार ,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१४.श्री.आदिनाथ लहानू दगडे, उपनिबंधक,सहकारी संस्था,नाशिक
१५.कक्ष अधिकारी (कार्या. ३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवड नस्ती (का.१५).
१७.प्रतिनियुक्ती संग्रह.